**जायकवाडी प्रकल्प टप्पा १ अंतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१७/६९/प्र.क्र.२१/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २८/०८/२०१८

<u>वाचा -</u>

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: पुनर्व-२०१७/६९/प्र.क्र.२१/र-८, दि. ०७/०७/२०१७
७) कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांचे पत्र क्र. मुपावि/प्रशा ४/ ३१७६/ २०१८, दि. २०/०७/२०१८
८) कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांचे पत्र क्र. मुपावि/प्रशा ४/३१९९/२०१८, दि. २४/०७/२०१८

<u>प्रस्तावना -</u>

कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांनी संदर्भाधिन क्र. ७ व ८ येथील पत्रान्वये जायकवाडी प्रकल्प टप्पा क्र. १ अंतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील संदर्भाधिन क्र. ६ अन्वये मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. याबाबत प्रकल्पांतर्गत नेवासा तालुक्यातील नागरी सुविधा कामांना शासन स्तरावरुन यांनी संदर्भाधिन क्र. ६ येथील आदेशान्वये रु. ४,८१,३९,४००/- एवढया रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, मूळ प्रशासकीय मान्यतेदरम्यानचे कालावधीमध्ये स्थापत्य कामांवर १२ टक्के वस्तु व सेवा कर लागु झाल्यामुळे तसेच अंदाजपत्रके सन २०१६-२०१७ च्या दरसूचीवर आधारित असल्यामुळे निविदा प्रक्रियेदरम्यान कामांचे देकार २७ ते ३० टक्के अधिक दराने स्विकारावे लागले. त्यामुळे प्रकल्प अधिकारी यांनी अंदाजपत्रकीय किंमती सन २०१७-२०१८ च्या दरसूचीनूसार अद्ययावत करुन सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची विनंती केली आहे. मुळ प्रशासकीय मान्यता प्राप्त कामांपैकी मौजे तरवडी येथील तरवडी तुपेवस्ती मार्ग ते भेंडा गेवराई रोड ०/८०० ते १/९७५ किमी हे काम जिल्हापरिषद, अहमदनगर इतर निधीतून करण्यात आले आहे. तथापि, तरवडी ग्रामपंचायतीने सा. क्र. १/९७६ ते ३/१५० किमी या पुढील साखळी क्रमांकाच्या रस्त्याचे काम करण्याबाबत ग्रामसभेचा ठराव केला असल्याने, प्रकल्पयंत्रणेकडून सदरचे काम सुरु करण्यात आले

असून यापूर्वी वितरीत निधी कामावर खर्च करण्यात आला आहे. त्यामुळे प्रकल्पयंत्रणेने सदर कामाच्या नावात बदल न करता साखळी क्रमांक बदलासह सुधारित किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत देखील विनंती केली आहे.

२. याबाबत शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दि.१७/०४/२०१५ अन्वये प्रदान अधिकारानुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ६ परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला सुधारित प्रशासकीय मान्यता करण्यासंदर्भात सुधारित अंदाजातील अधिक्य मुळ मंजूर अंदाजित खर्चाच्या १५ % मर्यादेत असल्यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास आहेत. सदर अधिकारानुसार, शासन स्तरावरुन संदर्भाधिन क्र. ६ च्या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या नागरी सुविधा कामांमधील मौजे वरखेड, उस्थळ दुमाला व रामडोह येथील ग्रामपंचायत कार्यालय ही तीन कामे अन्य योजनेतून करण्यात आली असल्याने, सदर तिन्ही कामे रद्द करुन उर्वरीत कामांना तसेच मौजे तरवडी येथील रस्त्याच्या साखळी क्रमांक बदलासह अद्ययावत किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

**त्यानुसार, जायकवाडी प्रकल्प टप्पा क्र. १ अंतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद नागरी सुविधांच्या २१ कामांच्या एकूण रू. ५,३२,७६,१५८/- ( अक्षरी रूपये पाच कोटी बत्तीस लक्ष शह्यात्तर हजार एकशे अट्ठावन्न फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस मुळ प्रशासकीय मान्यता आदेशातील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

२ कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांनी मुळ प्रशासकीय मान्यतेनुसार नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१८-२०१९ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२८१२४८५६६३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.08.28 12:52:35 +05'30'

**( दयानंद.शं. मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) नाशिक विभाग, नाशिक
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नाशिक

३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक अहमदनगर
४. अधिक्षक अभियंता तथा प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
५. कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
९. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन ) अहमदनगर
१०. जलसंपदा विभाग /मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
११. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१३. महसूल व वन विभाग, ब-१, पीएसी कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१७/६९/प्र.क्र.२१/र-८ दि. २८/०८/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**जायकवाडी प्रकल्प टप्पा १ अंतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान एकूण २१ नागरी सुविधा कामांचा तपशील**

| अ. क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | सुधारित अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | जैनपुर | बेलपिंपळगांव ते जैनपुर ० किमी ते ४/१३५ किमी | ८९,६५,६२२/- |
| २ | जैनपुर | जुने जैनपुर ते नवीन जैनपुर ० किमी ते १/४८० किमी | ३७,९०,२०७/- |
| ३ | धामोरी | धामोरी ते बहीरवाडी ० किमी ते २/९६० किमी | ६८,२४,०७२/- |
| ४ | धामोरी | नेवासा भालेगाव रस्ता ते धामोरी ० किमी ते १/६२० किमी | ४०,०८,१३२/- |
| ५ | सुरेगांव गंगा | सुरेगांव ते बोरगांव ० किमी ते १/९२० किमी | ४६,४०,२०३/- |
| ६ | बेलपांढरी | सुरेगांव ते बेलपांढरी गांव ०/०० ते ३/०० किमी | ७७,१५,७८९/- |
| ७ | तरवडी | तरवडी तुपेवस्ती मार्ग ते भेंडा गेवराई रोड १/९७६ ते ३/१५० किमी | २८,२३,८६०/- |
| ८ | उस्थलदुमाला | उस्थलदुमाला ते बॅकरोड ते नवीन चांदगांव ०/०० ते ०/२७० किमी | ६,२२,९५६/- |
| ९ | उस्थलदुमाला | उस्थलदुमाला ते एस.एच ५०- ० किमी ते ०/८८५ किमी | २२,२३,३५८/- |
| १० | उस्थलदुमाला | चांदगांव स्मशान ते उस्थलदुमाला ० ते ०/७२० किमी | १७,५२,४८५/- |
| ११ | उस्थलखालसा | समाजमंदिर | ६,२५,६९७/- |
| १२ | उस्थलदुमाला | समाजमंदिर | ६,८१,१८९/- |
| १३ | तरवडी | समाजमंदिर | ६,०९,४१०/- |
| १४ | सुरेगांवदही | समाजमंदिर | ६,२४,१६३/- |
| १५ | सुरेगांव गंगा | समाजमंदिर | ६,२५,१३६/- |

| अ. क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | सुधारित अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १६ | मंगळापुर | समाजमंदिर | ६,२१,३२८/- |
| १७ | खलालपिंप्री | समाजमंदिर | ६,७७,२०१/- |
| १८ | धामोरी | समाजमंदिर | ६,२०,९३४/- |
| १९ | उस्थलखालसा | ग्रामपंचायत कार्यालय | १६,०२,६६९/- |
| २० | तरवडी | ग्रामपंचायत कार्यालय | १६,१०,४०२/- |
| २१ | फत्तेपुर | ग्रामपंचायत कार्यालय | १६,११,३४५/- |
| | | एकूण | **५,३२,७६,१५८/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.08.28 12:53:10 +05'30'

(दयानंद. शं. मुंजाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन